न्यायालयीन प्रकरणाचा निकाल तपासी यंत्रणा अथवा अभियोक्त्यांच्या हलगर्जीपणामुळे शासनाच्या विरुध्द गेला असल्यास, संबंधितावर जबाबदारी निश्चित करण्यासाठी व त्याबाबतच्या शिफारसी करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन परिपत्रक क्रमांक -डीपीपी-२०१५/प्र.क्र.५१/पोल-१०
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १७ ऑक्टोबर, २०१५.

प्रस्तावना :-

गुजरात राज्य विरुध्द किशन भाई या न्यायालयीन प्रकरणाच्या (फौजदारी अपील क्र..१४८५/२००८) संदर्भात मा.सर्वोच्य न्यायालयाने दि.०७.०१.२०१४ च्या आदेशान्वये सर्व राज्यांतील गृह मंत्रालयांना कसुरदार तपासी अधिकारी व अभियोक्त्यांच्या विरुध्द कारवाई करणे तसेच तपासी यंत्रणा सक्षम करण्याबाबत आणि अभियोक्त्यांची न्यायालयीन खटल्यातील कार्यक्षमता वाढविण्यासाठी परीणामकारक धोरण अंमलात आणण्यासंदर्भात मार्गदर्शनपर सूचना केल्या आहेत. सदर आदेशातील परिच्छेद क्र.२१ खालीलप्रमाणे आहे:-

" We direct the Home Department of every State Government, to formulate a procedure for taking action against all erring investigating /prosecuting officials/officers. All such erring officials/officers identified, as responsible for failure of a prosecution case, on account of sheer negligence or because of culpable lapses, must suffer departmental action. The above mechanism formulated would infuse seriousness in the performance of investigating and prosecuting duties, and would ensure that investigation and prosecution are purposeful and decisive. The instant direction shall also be given effect to within ६ months."

सदर सूचना विचारात घेऊन, न्यायालयीन प्रकरणाचा निकाल तपासी यंत्रणा अथवा अभियोक्त्यांच्या हलगर्जीपणामुळे शासनाच्या विरुध्द गेला असल्यास, संबंधितावर जबाबदारी निश्चित करण्यासाठी व त्याबाबतच्या शिफारसी करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने वरीलप्रमाणे दिलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने ज्या गुन्ह्यामध्ये आरोपींची निर्दोष मुक्तता झाली आहे, त्याबाबतच्या न्यायालयाच्या आदेशाची तपासणी करुन सदर खटल्याचा निकाल शासनाच्या विरुध्द जाण्यामागील कारणे काय आहेत, याची तपासणी करणे व सदर न्यायालयीन प्रकरणाचा निकाल तपासी यंत्रणा अथवा अभियोक्त्यांच्या हलगर्जीपणामुळे शासनाच्या विरुध्द गेला असल्यास, संबंधितावर जबाबदारी निश्चित करण्यासाठी व त्याबाबतच्या शिफारसी करण्यासाठी जिल्हास्तरावर अतिरीक्त पोलीस अधीक्षक यांच्या अध्यक्षतेखाली तर पोलीस आयुक्तालय स्तरावर पोलीस उपायुक्त (गुन्हे) यांच्या अध्यक्षतेखाली समितीची संरचना खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | जिल्हास्तरीय समिती | अ.क्र. | पोलीस आयुक्तालय स्तरावरील समिती |
|---|---|---|---|
| १ | अतिरीक्त जिल्हा पोलीस अधीक्षक,<br>- अध्यक्ष. | १ | पोलीस उपायुक्त (गुन्हे),<br>- अध्यक्ष. |
| २ | पोलीस निरीक्षक (स्थानिक गुन्हे शाखा)<br>- सदस्य | २ | पोलीस निरीक्षक (गुन्हे)<br>- सदस्य |
| ३ | सहाय्यक सरकारी अभियोक्ता,<br>-सदस्य | ३ | सहाय्यक सरकारी अभियोक्ता,<br>-सदस्य |

सदर समितीने तीन महिन्यातून एकदा बैठकीचे आयोजन करावे.

ज्या गुन्ह्यामध्ये आरोपींची निर्दोष मुक्तता झाली आहे, त्याबाबतच्या फौजदारी प्रकरणातील न्यायालयाच्या आदेशांची तपासणी करुन सदर खटल्याचा निकाल शासनाच्या विरुध्द जाण्यामागील कारणांची नोंद करावी. जर संबंधित तपासी पोलीस यंत्रणा/सरकारी अभियोक्ते हे त्यामध्ये दोषी आढळल्यास त्यासंबंधीचा प्रस्ताव शिस्तभंग विषयक कारवाई करण्यासाठी संबंधित जिल्हा पोलीस अधिक्षक/पोलीस आयुक्त/संचालक अभियोग संचालनालय, मुंबई यांच्याकडे सादर करावा.

२. उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करून प्रभावी अंमलबजावणीकरिता सर्व पोलीस घटक तसेच संचालक अभियोग संचालनालय जबाबदार राहतील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५१०१७१७०८४३४१२९ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatray Santaram Patil
Date: 2015.10.17 17:13:19 +05'30'

**(द.सं. पाटील)**

उप सचिव (विधि), गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय मुंबई.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
८. सर्व पोलीस आयुक्त
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१०. सर्व अपर पोलीस महासंचालक
११. सर्व पोलीस अधीक्षक
१२. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१४. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
१५. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. सर्व कार्यासने गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवडनस्ती.